**प्रा. जेष्ठराज भालचंद्र जोशी, प्राध्यापक, डॉ. होमी भाभा राष्ट्रीय संस्था, मुंबई यांची रसायन तंत्रज्ञान संस्थेच्या "कुलपती" पदावर नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१११९/(११९/१५)/तांशि-२,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:-१२ जुलै, २०२४.

वाचा :-

१) मानव संसाधन विभाग अधिसूचना क्र.F-९.६१/२००५/U-३, दि.१२ सप्टेंबर, २००८
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.-डब्ल्यूबीपी-२०१०/(२१८/१०)/तांशि-२, दि.१९ एप्रिल, २०११.
३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.-धोरण-२०१३/(१३५/१३)/तांशि-२, दि.०९ एप्रिल,२०१४.
४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.-संकिर्ण-१११९/(११९/१५)/तांशि-२, दि.१३ जुलै, २०१५.
५) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.-धोरण-३०११/(५१/१६)/तांशि-२, दि.१७ मे, २०१७.
६) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.-संकिर्ण-१११९/(प्र.क्र.१३४/१९)/तांशि-२, दि.२५ जुलै, २०१९.

**प्रस्तावना :-**

रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई ही संस्था शासन अनुदानित अभिमत विद्यापीठ या दर्जाने कार्यरत आहे. या संस्थेस मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांच्या उपरोक्त संदर्भ क्र. (१) येथील दि.१२.०९.२००८ रोजीच्या अधिसूचनेव्दारे अभिमत विद्यापीठाचा दर्जा प्राप्त झालेला आहे. अभिमत विद्यापीठाचा दर्जा प्राप्त झाल्यानंतर विद्यापीठ अनुदान आयोग, अधिनियम, १९५६ च्या तरतूदीनुसार विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विद्यापीठ अनुदान आयोग (अभिमत विद्यापीठ संस्था) विनियमाच्या अधिसूचनेनुसार सदर अभिमत विद्यापीठाचे प्रशासकीय व शैक्षणिक कामकाज संस्थेमार्फत चालविण्यात येत असून, उतीर्ण विद्यार्थ्यांना संस्थेमार्फत पदवी प्रदान करण्यात येते.

विद्यापीठ अनुदान आयोग, विनियम २०१० च्या तरतूदी विचारात घेऊन सुरळीतपणे कामकाज पार पाडण्यासाठी संस्थेच्या स्वतंत्रपणे तयार केलेल्या परिनियमास शासनाने दि.०९.०४.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर परिनियमामधील नियम-१० मध्ये 'कुलपती' या पदावर नियुक्तीसाठी पुढीलप्रमाणे तरतूद आहे.

"The Chancellor shall be an eminent academician or scientist/engineer of international repute having a fellowship of at least two academies in India or abroad, having earned a great reputation as a scholar and researcher of an international repute, measured by appropriate academic standards and parameters including civilian honours. Alternatively, s/he should be an industrialist of international repute. The Chancellor shall be appointed by the Government of Maharashtra in consultation with the outgoing chancellor and Board of Governors and the term of appointment shall be five calendar years."

त्याअनुषंगाने, संदर्भ क्र.(१) मधील अधिसूचनेन्वये डॉ. रघुनाथ अ. माशेलकर, माजी डायरेक्टर जनरल, सी. एस. आय. आर. व सी. एस. आय. आर., भटनागर फेलो, नॅशनल केमिकल लॅबोरेटरिज, पुणे यांची नियुक्ती रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा या संस्थेच्या 'कुलपती' या पदावर संदर्भ क्र.(४) च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली होती, तसेच संदर्भ क्र.(६) च्या दि.२५.०७.२०१९ च्या शासन निर्णयान्वये पाच वर्षासाठी फेर नियुक्ती करण्यात आली होती. सदरचा कालावधी दि.२१.०६.२०२४ रोजी संपुष्टात आला आहे. सबब, संदर्भाधीन विनियमातील तरतुदी विचारात घेता रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई या अभिमत विद्यापीठामधील 'कुलपती' या पदावर प्रा. जेष्ठराज भालचंद्र जोशी, प्राध्यापक, डॉ. होमी भाभा राष्ट्रीय संस्था, मुंबई यांची नियुक्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

रसायन तंत्रज्ञान संस्थेचे परिनियमांमधील नियम क्रमांक १० मधील तरतूद विचारात घेऊन **प्रा.जेष्ठराज भालचंद्र जोशी, प्राध्यापक, डॉ. होमी भाभा राष्ट्रीय संस्था, मुंबई यांची रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई या संस्थेच्या 'कुलपती' या पदावर दि.२२.०६.२०२४ पासून पुढील पाच वर्षासाठी नियुक्ती करण्यात येत आहे**.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१२१८३५०५७९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH JAGDERAO TIDKE

Digitally signed by SATISH JAGDERAO TIDKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=abbed596652773468508d937a99472988ebdda28db8c543b79abe527c99646f6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BEDB6CD16BD8FBD810E0A53F2B92CE7FD9AB37DD50427E28109CBB133F9887D3, cn=SATISH JAGDERAO TIDKE
Date: 2024.07.12 19:02:05 +05'30'

**( सतीश तिडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मंबई.
३) मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव, मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
५) सचिव, विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली.
६) डॉ.जेष्ठराज भालचंद्र जोशी, कुलपती, रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई-१९.
७) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) सर्व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण, मुंबई.
९) उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने.
१०) निवड नस्ती कार्यासन (तांशि-२)